**<u>सुधारीत अंदाज आर्थिक वर्ष २००९-२०१०</u>**
**मागणी क्र.वाय-०६, ४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (योजनेतर)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र.बीयुडी-१००९/प्र.क्र.१०८/पापु-१५,**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२**
**दिनांक - ३० मार्च २०१०**

**वाचा**-१) शासन निर्णय, समक्रमांक दिनांक २४ एप्रिल,२००९, दि.३० जून,२००९, दि.१५ सप्टेंबर,२००९, दि.३१ डिसेंबर,२००९ व दि.९ मार्च २०१०.

**<u>प्रस्तावना</u>:-**

सन २००९-२०१० या आर्थिक वर्षात भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या आस्थापनेचा व इतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्र.वाय-६, लेखाशीर्ष "४४०२- मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च " (४४०२ ११४८)(दत्तमत)खाली एकूण रु.११९३.८० लक्ष व (४४०२ ११३९)(भारीत )) खाली रु.५.०० लक्ष या प्रमाणे एकूण रु.११९८.८० लक्ष तरतूद करण्यात आली होती. सदर तरतूद संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयांन्वये संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचेकडे सुपूर्द करण्यात आलेली आहे.

सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठीचे सुधारीत अंदाज वित्त विभागाने कळविले आहेत. भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या आस्थापनेचा व इतर खर्च भागविण्यासाठी "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च " या लेखाशिर्षाखाली सुधारीत अंदाजात रु.१३२५.४४ लक्ष इतकी दत्तमत्त व रु.५.०० लक्ष इतकी भारित याप्रमाणे एकूण रु.१३३०.४४ लक्ष तरतूद करण्यात आली आहे. सदर सुधारीत अंदाजाची तरतूद संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचेकडे सुपूर्द करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णयः-**

वित्त विभागाकडून भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या आस्थापना व इतर खर्च भागविण्याकरीता "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च " या लेखाशिर्षाखाली **सुधारित अंदाजात अर्थसंकल्पित करण्यात आलेली रु.१३२५.४४ लक्ष (रुपये तेरा कोटी पंचवीस लक्ष चौवेचाळीस हजार फक्त) इतकी दत्तमत्त व रु.५.०० लक्ष (रुपये पाच लक्ष फक्त ) इतकी भारित याप्रमाणे एकूण रु.१३३०.४४ लक्ष ( रुपये तेरा कोटी तीस लक्ष चौवेचाळीस हजार फक्त)** तरतूद संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांच्याकडे या शासन निर्णयाव्दारे सुपूर्द व मूक्त करण्यात येत आहे.

***२. भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या आस्थापनेच्या काही उद्दिष्टांखाली सुधारीत अंदाजात कमी अनुदान प्राप्त झाल्याने व या वित्तीय वर्षात त्या उद्दिष्टाखाली जास्तीचा खर्च अपेक्षित असल्याने महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका, नियम १६६ अन्वये रु.१३३०.४४ लक्ष अनुदानाचे सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील स्तंभ-६ मध्ये दर्शविल्याप्रमाणे पुर्नवितरण करण्यात येत आहे.***

३.     मंजूर तरतूदीतून संचालकांनी सुधारित मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे (Monthly Cash Flow) करावा. सदर खर्च मागणी क्र.वाय-६,४४०२- मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च-१०१ मृद सर्वेक्षण व चाचणी (०१)(०१) एक- भूजल सर्वेक्षण आणि विकास अभिकरण याखालील लहान पाटबंधारे योजना (४४०२ ११४८) दत्त मत या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

४.     महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका, नियम १६६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय, विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक ११.०७.२००१ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३ अ.क्र.३ नुसार सदर आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

५.     सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra. gov.in** या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३३०१७१३४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(श.वि.दुर्वे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक , भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,सर्व
४. उप अभियंता (यां), भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,सर्व
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई/२ नागपूर (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता)
६. वित्त विभाग, अर्थसंकल्प-१६ ( २ प्रती)
७. कक्ष अधिकारी/ लेखा अधिकारी,पापु-०४, पापु-०७, पापु-२०
८. निवड नस्ती पापु-१५

# विवरणपत्र

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,शासन निर्णय क्र.बीयुडी-१००९/प्र.क्र.१०८/पापु-१५, दिनांक - ३० मार्च २०१० सोबतचे विवरणपत्र -

(रु. लाखात)

| अ. क्र | मागणी क्र.वाय-०६, ४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (योजनेतर) खालील उपशिर्ष | सन २००९-१० करिता मंजूर तरतूद | दि.३० जून २००९ व दि.३१ डिसेंबर २००९ च्या शासन निर्णयान्वये पुर्नवितरी त करण्यात आलेली तरतूद | वित्त विभागाने मंजूर केलेली सुधारित तरतूद | या शासन निर्णयान्वये पुर्नवितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | ०१ वेतन | ९०२.६८ | ९०२.६८ | १०३४.३२ | १०३४.३२ |
| २. | ०२ मजुरी | ०.०० | ०.०० | २.४३ | ०.०० |
| ३. | ०३ अतिकालीक भत्ता | ०.२५ | ३.७५ | ७.३४ | ३.७५ |
| ४. | ०६ दुरध्वनी वीज देयके | ६.४७ | १८.४७ | ३२.६४ | १८.४७ |
| ५. | ११ प्रवास खर्च | ३३.६३ | ३०.१३ | ३०.१३ | ३०.१३ |
| ६. | १३ कार्यालयीन खर्च | २५.८६ | २९.८६ | २५.८६ | २९.८६ |
| ७. | १४ भाडे,पट्टी व कर | २१.९३ | २१.९३ | २९.१८ | २१.९३ |
| ८. | २४ पेट्रोल ,तेल, वंगण | ९.७५ | ७९.५० | २३.५१ | ७९.५० |
| ९. | २६-जाहिरात व प्रसिध्दी | ०.२५ | ०.२५ | ०.२५ | ०.२५ |
| १०. | २७ गौण बांधकाम | १.०५ | १.०५ | १.०५ | १.०५ |
| ११. | ५१ मोटार वाहने | १८.३० | १८.३० | २७.६० | १८.३० |
| १२. | ५२ यंत्र सामुग्री व साधन सामुग्री | १७३.६३ | ८७.८८ | १११.१३ | ८७.८८ |
| १३. | **एकूण दत्तमत** | **११९३.८०** | **११९३.८०** | **१३२५.४४** | **१३२५.४४** |
| १४. | ५०- इतर खर्च (भारीत) | ५.०० | ५.०० | ५.०० | ५.०० |
| १५. | **एकूण भारीत** | **५.००** | **५.००** | **५.००** | **५.००** |
| १६. | **एकूण सर्व** | **११९८.८०** | **११९८.८०** | **१३३०.४४** | **१३३०.४४** |

(श.वि.दुर्वे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन